**सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०२५/प्र.क्र.५२/का-७ अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३० एप्रिल, २०२५.

वाचा :-
१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७.४.२०२५,
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, मुंबई यांचे दि.७.४.२०२५ रोजीचे पत्र,
३. समक्रमांकाचा दि.२२.४.२०२५ रोजीचा शासन निर्णय.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिनस्त एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येते. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक-एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष २२३६- पोषण आहार अंतर्गत एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे माहे एप्रिल २०२५ चे वेतन अदा करण्यासाठी खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-२ मधील लेखाशीर्ष/उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक- ५ प्रमाणे एकुण रु.५०.०० कोटी ( रुपये पंन्नास कोटी फक्त ) इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये कोटीत)**

| अ.क्र | लेखाशिर्ष व बाब | अर्थसंकल्पित तरतूद (२०२५-२६) | यापूर्वी वितरीत तरतूद | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | (०८) (०५) अंगणवाडी सेवा (अतिरिक्त राज्य हिस्सा १००%) (कार्यक्रम) (२२३६१९४५) ०१ वेतन | ७२.०० | १०.०० | १०.०० |
| २ | (००)(०६) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ यांच्या कलम १२३ व २६१ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत अंगणवाडी सेवेसाठी जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान अतिरिक्त राज्य हिस्सा १००% (२२३६- | २५५.०० | ४०.०० | ४०.०० |

| अ.क्र | लेखाशिर्ष व बाब | अर्थसंकल्पित तरतूद (२०२५-२६) | यापूर्वी वितरीत तरतूद | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | २१७३),<br>३६ सहायक अनुदाने(वेतन) | | | |
| | **एकूण** | **३२७.००** | **५०.००** | **५०.००** |

**२.** सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी केंद्र शासनाच्या मागदर्शक सूचनांचे तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

**३.** सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौ. संदर्भ क्र.१४९/२०२५/का.१४७२, दि.११.४.२०२५ व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.१५०/व्यय-६, दि.१७.४.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०४३०१२०९२८७३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.04.30 12:11:24 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
२. महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
३. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद, (आयुक्तालय, ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत),
४. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत ),
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर,
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत ),
७. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत ),
८. कार्यासन(व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
९. कक्ष अधिकारी (का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई, ९
१०. निवड नस्ती-का.७ अ.